**वनक्षेत्रपाल संवर्गातील अधिकाऱ्यांना प्रशिक्षण कालावधीत अदा करण्यात आलेले ठोक वेतन व प्रत्यक्ष वेतन यातील फरकाची रक्कम अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग, मंत्रालय,**
**शासन आदेश क्रमांक : एस-३०/२०१५/प्र.क्र.७३/फ-४.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ जुलै, २०१८.

वाचा :- १) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मुळ अर्ज क्र.५४/२०१५ मध्ये दि.१६/९/२०१६ रोजी दिलेला निर्णय.

२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. टीआरएल-२०१३/प्र.क्र.८४/ १३/१२-अ दि.९/५/२०१४

३) अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (प्रशासन- दुय्यम संवर्ग) नागपुर यांचे पत्र क्र.कक्ष क्र.१०(१) /आस्था/एक/प्र.क्र.२६१/(१५-१६) / ९७/दि.१२/०६/२०१८.

प्रस्तावना :-

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. टीआरएल-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ दि.९/५/२०१४ नुसार प्रशिक्षण कालावधीत गट-अ संवर्गातील उमेदवारांना रु. ३००००/- आणि गट-ब संवर्गातील उमेदवारांना रु. २००००/- इतके ठोक वेतन अनुक्रमे यशदा, पुणे व वानामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थामार्फत अदा करण्यात येते. परिविक्षाधिन कालावधी पूर्ण झाल्यानंतर संबंधित विभागाकडे हजर झाल्यावर या उमेदवारांच्या दोन वर्षाच्या परिविक्षाधिन कालावधीतील अदा करण्यात आलेली ठोक वेतनाची रक्कम आणि प्रत्यक्ष वेतन यामधील फरकाची रक्कम संबंधित विभागाकडून आवश्यक ते समायोजन केल्यानंतर (जसे भविष्य निर्वाह निधी अंशदान, व्यवसाय कर, आयकर इ.) एकरकमी अदा करण्यात येते.

२. वन विभागांतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून सरळसेवेने नियुक्त झालेल्या वनक्षेत्रपाल संवर्गातील अधिकाऱ्यांचा प्रशिक्षण कालावधी कर्तव्य कालावधी गणन्यात येऊन या कालावधीत देण्यात येणाऱ्या विद्यावेतनाऐवजी (Stipend) या पदाच्या वेतनश्रेणी नुसार नियमित वेतन मिळण्यासाठी श्री.अजित साजणे व इतर २७ वनक्षेत्रपाल यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र. ५४/२०१५ रोजी दाखल केला होता.

३. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मुळ अर्ज क्र.५४/२०१५ तसेच पुनर्विलोकन याचिका क्रमांक ६/२०१६ मध्ये दि.१६/९/२०१६ रोजी या न्यायालयीन प्रकरणातील अर्जदार यांना त्यांचे प्रशिक्षण कालावधीत अदा करण्यात आलेले ठोक वेतन व प्रत्यक्ष वेतन यातील फरकाची रक्कम अदा करण्यात यावी असा निर्णय दिला आहे.

४. त्यानुषंगाने याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. मूळ अर्ज क्रमांक ५४/२०१५ मधील वनक्षेत्रपाल या पदावरील २८ अधिकाऱ्यांच्या मर्यादेत मा. न्यायाधिकरणाने दिनांक दिनांक १६/९/२०१६ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन त्यांना प्रत्यक्ष वेतन व ठोक रक्कम यांच्या फरकाची रक्कम अदा करण्यास वित्त विभागाने सहमती दिली आहे. त्यानुसार शासन आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

१. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मुळ अर्ज क्र.५४/२०१५ तसेच पुनर्विलोकन याचिका क्रमांक ६/२०१६ मध्ये दि.१६/९/२०१६ रोजी या न्यायालयीन प्रकरणातील अर्जदार एकुण २८ वनक्षेत्रपाल यांना त्यांचे प्रशिक्षण कालावधीत अदा करण्यात आलेले ठोक वेतन व प्रत्यक्ष वेतन यातील फरकाची रक्कम अदा करण्यात यावी असा निर्णय दिला आहे.

२. त्यानुषंगाने मूळ अर्ज क्रमांक ५४/२०१५ मधील अर्जदार , सोबतच्या परीशिष्ठामध्ये नमुद केलेल्या वनक्षेत्रपाल या संवर्गातील २८ अधिकाऱ्यांना त्यांचे प्रशिक्षण कालावधीत अदा करण्यात आलेले ठोक वेतन व प्रत्यक्ष वेतन यातील फरकाची रक्कम मंजूर करण्यासाठी एकुण रू.५७,११,३००/- (रू. सत्तावन्न लक्ष आकरा हजार तीनशे फक्त) अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. मूळ अर्ज क्रमांक ५४/२०१५ मधील मूळ अर्जातील अर्जदारांबाबत म.ना.से. (वेतन) नियम १९८१ मधील नियम क्र.३९, शासन निर्णय सा.प्र.वि. दिनांक ९/५/२०१४ व शासन निर्णय वित्त विभाग दिनांक २६/१२/२०११ मधील तरतूदी विचारात घेऊन मूळ अर्ज क्रमांक ५४/२०१५ मधील सोबतच्या परिशिष्टातील अर्जदारांना त्यांच्या वार्षिक वेतनवाढी मंजूर कराव्यात.

४. सदरहू खर्च या अधिकाऱ्यांच्या वेतनावरील खर्च ज्या लेखाशिर्षाखाली भागविण्यात येतो त्या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

५. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.४७८/१७/सेवा -३ दि.१४/११/२०१७ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२०१०४८१२०३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2018.07.20 10:49:11 +05'30'

**(अनिल धस)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), पुणे
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव ), नागपूर
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर
५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव), सर्व
६) उप वनसंरक्षक ( प्रादेशिक / वन्यजीव/सामाजिक वनीकरण) सर्व
७) महालेखापाल (१) (२), (लेखा परिक्षा व लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
९) निवडनस्ती फ-४ कार्यासन

**शासन आदेश महसूल व वन विभाग क्रमांक शासन आदेश क्रमांक एस-३०/२०१५/प्र.क्र.७३/फ-४.**
**दि. १९ जुलै २०१८ सोबतचे परिशिष्ट**

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री.अजित महावीर साजने | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २ | श्री.सचिन बाबुराव निलख | वनक्षेत्रपाल गट- ब |
| ३ | श्री.मयूर एस.बोठे | वनक्षेत्रपाल गट- ब |
| ४ | श्री.विश्वजीत भगवान जाधव | वनक्षेत्रपाल गट- ब |
| ५ | श्री.जितेंद्र जे. कोऱ्हाले | वनक्षेत्रपाल गट- ब |
| ६ | श्री.सुनिल के.लाड | वनक्षेत्रपाल गट- ब |
| ७ | श्री.कमलेश एस. पाटील | वनक्षेत्रपाल गट- ब |
| ८ | श्री.राजेंद्र आर. पाटील | वनक्षेत्रपाल गट- ब |
| ९ | श्री.रोहीत आर. चोबे | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १० | श्री.प्रजोत डी.पालवे | वनक्षेत्रपाल गट- ब |
| ११ | श्री.धनंजय जी. पवार | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १२ | श्री.भिमसिंग एन. ठाकूर | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १३ | श्रीमतर.रूतूजा जी.लटके | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १४ | श्री.उमेश एम.बिराजदार | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १५ | श्री.प्रशांत देवेंद्र कोऱ्हाले | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १६ | श्री.अनिल जे. पवार | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १७ | श्री.साकेत एन.शेंडे | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १८ | श्री.संदेश बी. पाटील | वनक्षेत्रपाल गट- ब |
| १९ | श्री.अमित लक्ष्मण भिसे | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २० | श्रीमती परवीन बी.पठाण | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २१ | श्री.सुदर्शन के.शिसव | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २२ | श्री.मनोज एन.चव्हाण | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २३ | श्रीमती प्रिया डी.मालवे | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २४ | श्रीमती आशा इ. चव्हाण | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २५ | श्रीमती शिल्पा बी.फुले | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २६ | श्री.अशुतोश जी. शेंडगे | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २७ | श्री.बाबा जी.हके | वनक्षेत्रपाल गट- ब |
| २८ | श्रीमती.शितल एस.नानगरे | वनक्षेत्रपाल गट- ब |

********